सुशिक्षित बेरोजगारांची समस्या परिणामकारक पध्दतीने सोडविण्याकरीता उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्रिस्तरीय समिती स्थापन करणेबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**रोजगार व स्वयंरोजगार विभाग**
शासन निर्णय क्रमांकः रोस्वरो २०१०/प्र.क्र.१३३/रोस्वरो-१,
नवीन प्रशासकीय इमारत, १४वा मजला,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ४ ऑगस्ट, २०१०.

**प्रस्तावना :**

राज्यातील रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रात जून २०१० अखेर २८.७३ लाख उमेदवारांची नोंदणी झालेली आहे. दिनांक १५.०४.२०१० रोजी मंत्रिमंडळ बैठकीत राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांचे वाढते प्रमाण व बेरोजगारांची समस्या परिणामकारक पध्दतीने सोडविण्यासाठी एक सक्षम व स्वतंत्र यंत्रणा उभारण्यासंबंधातील एका अशासकीय ठरावावर चर्चा करण्यात आली. त्यावेळी मा.मुख्यमंत्र्यांनी सूचना केली की, सुशिक्षित बेरोजगारांचा प्रश्न दिवसेंदिवस गंभीर होत असून, त्यावर तातडीने उपाययोजना करण्याची आवश्यकता आहे. राज्यातील सध्याची सेवायोजन यंत्रणा अधिक परिणामकारक करण्याची आवश्यकता तसेच, बेरोजगारांना रोजगाराभिमुख प्रशिक्षण देण्यासाठी व सुशिक्षित बेरोजगारांना मार्गदर्शनासाठी प्रभावी उपाययोजना करणे गरजेचे आहे. त्यादृष्टीने रोजगार व स्वयंरोजगार विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग व कामगार विभाग यांच्यात समन्वय असणे आवश्यक आहे. या प्रश्नाचा तातडीने अभ्यास करुन उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्र्यांची समिती नेमावी व समितीवर आवश्यकतेप्रमाणे तज्ञानांही पाचारण करावे असे बैठकीत सूचित केले होते. त्यानुसार, राज्यातील सुशिक्षित बेरोजगारांच्या प्रश्नावर अभ्यास करुन उपाययोजना सुचविण्यासाठी मंत्र्यांची समिती स्थापन करण्याचे शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय:-**

राज्यातील सेवायोजन यंत्रणा अधिक परिणामकारक करण्यासाठी तसेच बेरोजगारांना रोजगाराभिमुख प्रशिक्षण देण्यासाठी व सुशिक्षित बेरोजगारांना मार्गदर्शन करण्यासाठी प्रभावी उपाययोजना सुचविण्यासाठी मा.मंत्री (रोजगार व स्वयंरोजगार) यांच्या अध्यक्षतेखाली समिती स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या समितीची रचना खालीलप्रमाणे राहील:-

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, उद्योग, रोजगार व स्वयंरोजगार | अध्यक्ष |
| २. | मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण | सदस्य |
| ३. | मा. मंत्री, आदिवासी विकास | सदस्य |
| ४. | मा. मंत्री, कामगार | सदस्य |
| ५. | मा. मंत्री, कृषी व शालेय शिक्षण | सदस्य |
| ६. | मा. मंत्री, अल्पसंख्याक विकास | सदस्य |
| ७. | मा.राज्यमंत्री, रोजगार व स्वयंरोजगार | सदस्य |

२. सदर समिती खालील विषयांबाबत विचार विनिमय करुन उपाय योजना सुचविल :-

१. सध्याच्या रोजगार व स्वयंरोजगार सेवा अधिक परिणामकारक कशा करता येतील,
२. रोजगार व स्वयंरोजगार मार्गदर्शन केंद्रांचे सक्षमीकरण करणे,
३. बेरोजगारांना रोजगाराभिमुख कोणकोणते प्रशिक्षण देता येईल,
४. सुशिक्षित बेरोजगारांना योग्य व चांगल्या प्रकारचे मार्गदर्शन कसे करता येईल,
५. विविध विभागामार्फत राबविण्यात येत असलेल्या रोजगार व स्वयंरोजगार योजनांची सांगड रोजगार व स्वयंरोजगार विभागाबरोबर घालून त्यांचा समन्वय साधणे,
६. राज्यातील भूमिपुत्र बेरोजगारांना नोक-या मिळण्याबाबत प्रधान सचिव, रोजगार व स्वयंरोजगार यांच्या अध्यक्षतेखालील अभ्यासगटाने सादर केलेल्या अहवालातील शिफारशींची तपासणी करणे व अंमलबजावणी करणे.

३. सदर समिती आवश्यकतेनुसार बैठकांचे आयोजन करुन विविध विभाग प्रमुख, विधान मंडळ सदस्य, तसेच, रोजगार व स्वयंरोजगार या विषयातील तज्ञांना बैठकीस बोलावून सविस्तर चर्चा करतील. समितीची स्थापना झाल्यापासून ६ महिन्यात समिती आपला अहवाल शासनास सादर करील.

४. या समितीचे सचिव म्हणून आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार हे काम पाहतील,

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००८०२२००६२०००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( ॲना दाणी )
अपर मुख्य सचिव

प्रति:
मा. राज्यपाल यांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
सर्व मा. मंत्री/ राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व विधान परिषद सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
सर्व विधानसभा सदस्य, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
महालेखापाल (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई,
सर्व मा. अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग,
आयुक्त, रोजगार व स्वयंरोजगार संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई,
सर्व व्यवस्थापकीय संचालक, रोजगार व स्वयंरोजगार व प्रशिक्षण योजना राबविणारी महामंडळे, (संबंधीत प्रशासकीय विभांगांमार्फत),
रोजगार व स्वयरोजगार विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती, रोजगार व स्वयंरोजगार विभाग, रोस्वरो-१.